**अधिक्षक, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई शहर कार्यालयासाठी जागा वाटप करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.शाकाजा-११२४/प्र.क्र.९३/२०२४/निवास-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :**

जुने जकात घर, शहीद भगतसिंग मार्ग, फोर्ट, मुंबई या इमारतीमधील दुसऱ्या मजल्यावरील राज्य उत्पादन शुल्काचे कार्यालय नवीन इमारत "राज्य उत्पादन शुल्क भवन", प्लॉट नं.१४५०, महानगर पालिका सभागृह मार्ग, फोर्ट, मुंबई येथे नव्याने बांधलेल्या शासकीय इमारतीमध्ये स्थलांतरीत झाले आहे. त्यामुळे रिकाम्या झालेल्या दुसऱ्या मजल्यावरील एकूण ११३४३.०० चौ.फुट जागेवर अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई शहर यांचे तळमजल्यावरील कार्यालय स्थलांतरीत झाले आहे व सदर जागेची त्यांना आवश्यकता असल्याने त्यांच्याकडे कायम ठेवणे ठेवणे बाबत अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई शहर यांनी शासनास विनंती केली आहे. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :**

जुने जकात घर, शहीद भगतसिंग मार्ग, फोर्ट, मुंबई या इमारतीमधील दुसऱ्या मजल्यावरील आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य कार्यालयाच्या ताब्यातील एकूण ११३४३.०० चौ.फुट जागा अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई शहर या कार्यालयाच्या वापरात असून सदर जागा तशीच त्यांच्याकडे कायम ठेवण्यात येत आहे.

२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांनी उपरोक्त जागेचा ताबा संबंधितांना दयावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१०१८२५५६३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEVIDAS SANDUJI BHAGURE

Digitally signed by DEVIDAS SANDUJI BHAGURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=0990ae5e49835c85a735703503a82e3cd3cdde019c8ce2fdb9c7765ef1b7c39f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D19FEFD30011466572B4E69158C3099ADDED4CBB59D6833F72ED93F73A564DC, cn=DEVIDAS SANDUJI BHAGURE
Date: 2025.02.10 18:27:10 +05'30'

**(दे. सां. भगुरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (राज्य उत्पादन शुल्क), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, "राज्य उत्पादन शुल्क भवन", प्लॉट नं.१४५०, महानगर पालिका सभागृह मार्ग, फोर्ट, मुंबई.
३. अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, जुने जकात घर, दुसरा मजला, शहिद भगतसिंग मार्ग, फोर्ट, मुंबई-०१.
४. कार्यकारी अभियंता, ईलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन इमारत, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
५. उप अभियंता, मध्य (सा.बां.) उपविभाग, मुंबई.
६. निवडनस्ती / कार्या.निवास-१